**नवी मुंबईतील कांदळवन संरक्षणासाठी स्थापन करण्यात आलेल्या सनियंत्रण समितीमध्ये अतिरिक्त सदस्याची नियुक्ती करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-३०/२०१५/प्र.क्र.४६२/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १८ मार्च, २०१७.

**पहा :-**

१) मा.उच्च न्यायालयातील जनहित याचिका क्र. २१८/२०१३ मधील दिनांक ३ व ४ ऑगस्ट, २०१५ चे अंतरिम आदेश.
२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३.१०.२०१५ व दिनांक २३.०२.२०१७.
३) मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई यांचे क्र. मुवकाव/जमीन/३४५३/२०१६-१७, दिनांक १५.०३.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र. २१८/२०१३ याचिकाकर्ते नवी मुंबई एन्वारमेंट प्रिझरवेशन सोसायटी यांनी सदर जनहित याचिका नवी मुंबईतील कांदळवनाच्या संरक्षणाबाबत दाखल केली आहे. प्रस्तुत प्रकरणी दिनांक ३ व ४ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या मा.न्यायालयाच्या आदेशान्वये विभागीय आयुक्त, कोंकण यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय दिनांक ३.१०.२०१५ अन्वये नवी मुंबईतील कांदळवन संरक्षणासाठी संनियंत्रण समिती गठीत करण्यात आली आहे. तसेच मा.न्यायालयाने दिनांक २७.१.२०१७ रोजी पारित केलेल्या आदेशान्वये मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई यांची सदर समितीत सदस्य सचिव म्हणून नियुक्ती करुन दिनांक २३.०२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती पुन:गठीत करण्यात आलेली आहे.

तद्नंतर मा. उच्च न्यायालयाने दिनांक २ मार्च, २०१७ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिले आहे -

*"As regards the inclusion of a representative of the Pollution Control Board in the Committee, the State Government will take necessary action before the next date."*

मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने शासन निर्णय दिनांक ३.१०.२०१५ अन्वये विभागीय आयुक्त, कोंकण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या नवी मुंबईतील कांदळवन संनियंत्रण समितीच्या संरचनेत बदल करुन सनियंत्रण समितीमध्ये प्रदुषण नियंत्रण मंडळाचे प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

नवी मुंबईतील कांदळवन संरक्षणासाठी शासन निर्णय दिनांक ३ डिसेंबर, २०१५ अन्वये विभागीय आयुक्त, कोंकण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या संनियंत्रण समितीच्या संरचनेत मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक २ मार्च, २०१७ रोजीच्या आदेशान्वये बदल करण्यात येत असून सदर सनियंत्रण समितीची संरचना पुढील प्रमाणे असेल -

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त कोंकण विभाग, नवी मुंबई. | अध्यक्ष |
| २ | पोलीस उपआयुक्त, विशेष शाखा नवी मुंबई | सदस्य |
| ३ | अपर आयुक्त, नवी मुंबई महानगर पालिका | सदस्य |
| ४ | महाव्यवस्थापक, पर्यावरण व वने सिडको | सदस्य |
| ५ | मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई | सदस्य सचिव |
| ६ | विभागीय वन अधिकारी, मुंबई कांदळवन संधारण घटक | सदस्य |
| ७ | नवी मुंबई एन्वारमेंट प्रिझरवेशन सोसायटी यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८ | महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | विभागीय आयुक्त, कोंकण यांनी नामनिर्देशित केलेले पर्यावरण क्षेत्रात काम करणारी अशासकीय संस्था (NGO) यांचे प्रतिनिधी | सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१८१२४४५८९३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.03.18 12:46:12 +05'30'

(वीरेंद्र तिवारी)
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रायल, मुंबई-३२.
२. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रायल, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रायल, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. विभागीय आयुक्त, कोंकण, नवी मुंबई.
८. आयुक्त, नवी मुंबई, महानगर पालिका.
९. पोलीस आयुक्त, नवी मुंबई.
१०.व्यवस्थापकीय संचालयक, सिडको, नवी मुंबई.
११.संचालक, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
१२.अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
१३.मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
१४.मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
१५.सर्व संबंधित उप वनसंरक्षक.